“मिशन लक्ष्यवेध” योजनेंतर्गत
आर्थिक वर्ष २०२४-२५ करीता
निधी वितरण करणेबाबत.
लेखाशीर्ष-२२०४-५३६८

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मिशन-३०२५/प्र.क्र.१९/क्रीयुसे-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख : २८ मार्च २०२५

**वाचा :-**

१. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. क्रीडायो-२४२३/प्र.क्र८२/क्रीयुसे-१, दिनांक ११.१.२०२४
२. सहासंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे यांचे दि.२८.१.२०२५ रोजीचा प्रस्ताव.
३. शासन निर्णय, वित्त विभाग,क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दिनांक १.३.२०२५.

**प्रस्तावना :-**

जागतिक स्तरावर क्रीडाक्षेत्राची प्रगती लक्षात घेऊन, खेळाडू हा केंद्रबिंदु मानून राज्यातील खेळाडूंच्या कामगिरीमध्ये सातत्यपूर्ण वाढ करण्याकरीता योजनाबध्द कृती कार्यक्रम हाती घेण्याची आवश्यकता आहे. याद्दष्टीने मा.उपमुख्यमंत्री तथा गृह, वित्त व नियोजन मंत्री, महाराष्ट्र राज्य यांनी सन २०२३-२४ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये राज्यातील खेळाडूंची कामगिरी उंचावण्याकरीता "मिशन लक्ष्यवेध" योजना राबविण्याबाबत घोषणा केली. त्याअनुषंगाने मंत्रीमंडळाच्या निर्णयानुसार संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय दिनांक ११ जानेवारी २०२४ अन्वये खेळाडू, प्रशिक्षक व स्पर्धा केंद्रित "मिशन लक्ष्यवेध" ही एक नवीन आणि महत्त्वाकांक्षी योजना अमलात आली.

ऑलिंपिकसह महत्त्वाच्या आंतरराष्ट्रीय स्पर्धांमध्ये निवड झालेल्या राज्यातील खेळाडूंची कामगिरी सातत्याने सुधारण्यासाठी एका पद्धतशीर कार्यक्रमाची आवश्यकता विचारात घेऊन या योजनेतंर्गत ॲथलेटिक्स, बॅडमिंटन, बॉक्सिंग, वेटलिफ्टिंग, हॉकी, कुस्ती, धनुर्विद्या, नेमबाजी, सेलिंग, लॉन टेनिस आणि टेबल टेनिस या १२ ऑलिंपिक खेळांवर लक्ष केंद्रित करण्यात येणार आहे. या क्रीडा प्रकारांकरिता राज्यातील ०६ ठिकाणी राज्यस्तरीय हाय परफॉर्मन्स सेंटर, ३७ विभागीय स्पोर्टस एक्सलन्स सेंटर व जिल्हास्तरावर १३८ जिल्हा क्रीडा प्रतिभा विकास केंद्रांची स्थापना करण्यात येणार आहे.

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतुदीतून "मिशन लक्ष्यवेध" योजनेंतर्गत विहीत बाबींसाठी खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"मिशन लक्ष्यवेध" या योजनेअंतर्गत हाय परफॉर्मन्स सेंटर कार्यान्वयीत करणे व अन्य विहित बाबींच्या अनुषंगाने उपलब्ध तरतुदीमधून रुपये रु.५००.०० लक्ष इतका निधी याद्वारे वितरीत करण्यास शासनाची खालील अटी शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरित करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवू नये.

२. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/ नियम/ शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेतील तरतुदी यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद आहरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग दिनांक २५.७.२०२४ आणि दिनांक १२.२.२०२५ मधील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्र.ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (०९) खेळाडूंना शिष्यवृत्या व पुरस्कार, (०९) (०९) राष्ट्रीय स्तरावर क्रीडा कौशल्य व तंत्र संबंधात खास शिक्षणाचा दर्जा वाढविणे (ऑलिम्पिक अभियान), ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेतर, (२२०४-५३६८)" या लेखाशीर्षाखाली या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. यासाठी लेखा अधिकारी, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय , महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११९/१४७१, दिनांक १७/२/२०२५ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३४३/व्यय-५, दिनांक १८/३/२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१३०३२७८९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78C14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.03.28 13:04:02 +05'30'

**( रणसिंग डेरे )**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री ( नगर विकास व गृहनिर्माण ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७. सर्व सन्मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, (अ.का.) क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
९. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१०. मा. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
११. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. वरिष्ठ कोषगार अधिकारी, पुणे
१३. जिल्हा कोषगार अधिकारी, पुणे
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१५. नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१६. अवर सचिव, अर्थसंकल्प कार्यासन, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१)...